आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत जनजाति क्षेत्र उपयोजनेखाली नव्याने अमलबजावणी करण्यात आलेल्या योजनांची विविध माध्यमांमार्फत माहिती व प्रसिद्धी (कार्यक्रम) या योजनेकरीता निधी वितरीत करणेबाबत.
(लेखाशिर्ष २२२५ ४११३)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/प्र.क्र.०२/ कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २८ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि. ०४.०३.२०२४
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. बीयुडी-२०२३/प्र.क्र.०२/कार्या-६, दि.०७.०७.२०२३ व दि.२७.०७.२०२३, दि.१५.९.२०२३, दि.११.१०.२०२३, दि.१७.१०.२०२३, दि.२५.१०.२०२३, दि.०१.०१.२०२४, दि.०८.०१.२०२४ व दि.०६.०२.२०२४, दि. १५.०३.२०२४, दि. २८.०३.२०२४
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. माप्रप्र-२५२३/प्र.क्र.२२२/कार्या-५, दि. २०.०२.२०२४
४) आदिवासी विकास विभाग, नस्ती क्र. माप्रप्र-२५२४/प्र.क्र.४७/कार्यासन-०५

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत जनजाति क्षेत्र उपयोजनेखाली नव्याने अमलबजावणी करण्यात आलेल्या योजनांची विविध माध्यमांमार्फत माहिती व प्रसिद्धी (कार्यक्रम) या योजनेंतर्गत संदर्भ क्र. ०३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या माध्यम आराखड्याचे देयक अदा करण्याकरिता आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावास अनुलक्षून, निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र. ३ येथील नस्तीद्वारा वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्रमांक टी-०५ मधील २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली राबविण्यात येणाऱ्या जनजाति क्षेत्र उपयोजनेखाली नव्याने अमलबजावणी करण्यात आलेल्या योजनांची विविध माध्यमांमार्फत

माहिती व प्रसिद्धी (कार्यक्रम) या योजनेंतर्गत संदर्भ क्र. ०३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या माध्यम आराखड्याचे देयक अदा करण्याकरिता वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या सुधारित अंदाजात मंजूर तरतुदीतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

(रुपये लाखात)

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **उद्दिष्ट** | **सन २०२३-२४ करीता मंजूर सुधारीत अंदाज** | **यापूर्वी वितरीत केलेला निधी** | **या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | | | |
| जनजाति क्षेत्र उपयोजनेखाली नव्याने अमलबजावणी करण्यात आलेल्या योजनांची विविध माध्यमांमार्फत माहिती व प्रसिद्धी (कार्यक्रम) | २२२५ ४११३ | २६, जाहिरात व प्रसिद्धी | १४७०.०० | १३२८.२६ | १४०.०४ |
| | | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | २१००.०० | ७६०.०५ | ११९.९६ |
| | | **एकूण :-** | ३५७० | २०८८.३१ | १२६०.०० |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु. १२६०.०० लाख (अक्षरी रुपये बारा कोटी साठ लाख फक्त)** इतका निधी योजनेचे नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर वितरीत निधीचा विनियोग यापूर्वीच जाहिरात व प्रसिद्धीवर केलेल्या खर्चाचे दायित्त्व भागविण्यासाठी करावा.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ मधील नमूद शासन परिपत्रकांमध्ये दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेल्या भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय, संदर्भाधीन क्र. ०१ येथील शासन परिपत्रकान्वये व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना वेळो-वेळी प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ३४२/२०२४/व्यय-१४, दि. २६.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२७१८२४११८३२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.03.31 19:48:47 +05'30'

**(राजेंद्र दे.भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
४) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

६) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.

७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/ व्यय-१४), मंत्रालय, मुंबई-३२.

९) कक्ष अधिकारी (का-५), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग.